**सन २०१०-११ च्या विभाग/जिल्हास्तरावरील**
**विक्री प्रदर्शनाची कालदर्शिका.**

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन परिपत्रक क्र. पणन-२०१०/प्र.क्र.१३३/ योजना-१
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२ दि. २४ डिसेंबर, २०१०,

**शासन परिपत्रक**

ग्राम विकास विभागामार्फत १९९९ पासून दारिद्र्य रेषेखालील कुटुंबातील व्यक्तींचे जीवनमान उंचावून देशातील प्रगत तंत्रज्ञान सोप्या पध्दतीने त्यांच्यापर्यंत पोहोचवून त्यांना रोजगार मिळवून देऊन त्यांचे उत्पादन किमान रु. २०००/- प्रति महा इतके व्हावे, या उद्देशाने स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजना (७५% केंद्र व २५% राज्य पुरस्कृत) योजना राबविण्यात येत आहे. यामध्ये स्वयंसहायता गट / स्वरोजगारी यांना व्यवसायाभिमुख प्रशिक्षण देण्यात येते. तसेच त्यांना व्यवसायासाठी अनुदान व कर्जही उपलब्ध करुन देण्यात येते. या स्वरोजगारीने तयार केलेल्या वस्तुंना हक्काची बाजारपेठ मिळणे आवश्यक झाले होते, या उद्देशाने शासनस्तरावर प्रत्येक विभागीय व जिल्हा पातळीवर विक्री प्रदर्शने आयोजित करण्याचा आणि जिल्ह्याच्या व तालुक्याच्या ठिकाणी कायमस्वरुपी विक्री केंद्रे उभारणीचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्या अनुषंगाने राज्य स्तरीय महालक्ष्मी सरसच्या धर्तीवर स्वयंसहाय्यता बचत गटांच्या उत्पादित मालाची विक्री व प्रदर्शनासाठी विभागीय व जिल्हास्तरावर दरवर्षी विक्री प्रदर्शने आयोजित करुन विभागीय प्रदर्शनासाठी प्रत्येकी रु.२५.०० लक्ष व जिल्हा प्रदर्शनासाठी प्रत्येकी रु.१०.०० लक्ष प्रमाणे अर्थसहाय्य देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

२. त्याअनुषंगाने शासन परिपत्रक क्रमांक: पणन-२०१०/प्र. क्र.१३३/ योजना-१, दिनांक : १५ ऑक्टोंबर, २०१० अन्वये महसुली विभाग स्तरावरील विभागीय व जिल्हास्तरावर विक्री प्रदर्शने आयोजित करण्यासाठी प्रदर्शनाची कालदर्शिका संबंधित विभागीय आयुक्त यांनी निश्चित करुन शासनाच्या मान्यतेसाठी सादर करण्याबाबत कळविण्यात आले होते. त्यानुसार सर्व विभागीय आयुक्त यांचेकडून प्रदर्शनाच्या तारखांचे प्राप्त प्रस्तावांचा विचार करुन राज्यातील विभाग/जिल्हास्तरावरील **प्रदर्शनाची कालदर्शिका** तयार करण्यात आली असून त्यास मान्यता देण्यात येत आहे. सोबत जोडलेल्या **प्रपत्र "अ"** नुसार सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांनी आपल्या स्तरावर कालदर्शिकेप्रमाणे विभाग/ जिल्हास्तरावरील विक्री प्रदर्शनाचे नियोजन करावे.

**३. प्रदर्शनाच्या नियोजनादरम्यान खालील गोष्टींचे काटेकोरपणे पालन करावे.**

१. विभागस्तरावरील प्रदर्शनाचा कालावधी किमान ७ दिवस व जिल्हास्तरावरील प्रदर्शनाचा कालावधी किमान ५ दिवस असावा.

२.विभागीय स्तरावरील व जिल्हास्तरावरील विक्री प्रदर्शन एकत्रितपणे आयोजित करावयाचे असल्यास विक्री प्रदर्शनाचा कालावधी गरजेप्रमाणे वाढविण्याचे विभागीय आयुक्त यांनी ठरवावे.

**३.विभागीय विक्री प्रदर्शन व जिल्हा स्तरावरील विक्री प्रदर्शन याकरीता शासन निर्णय क्र.बीजीटी-२०१०/प्र.क्र.४/योजना-१, दि.२९.११.२०१० अन्वये निधी वितरीत करण्यात आला आहे. त्यामध्ये नमूद केलेल्या रकमेच्या मर्यादेत खर्च करणे आवश्यक आहे. अधिक झालेल्या खर्चास कोणत्याही परिस्थितीत मान्यता देण्यात येणार नाही.**

**४. विभागीय विक्री प्रदर्शन व जिल्हा स्तरावरील विक्री प्रदर्शनाचा निधी अखर्चीत राहिल्यास अगर बचत झाल्यास सदर रक्कम शासनाप्रती मार्च २०११ पूर्वी प्रत्यार्पित करण्यात यावी.**

५. विभागीय मुख्यालयाच्या ठिकाणी व जिल्हास्तरावरील आयोजित करावयाच्या विक्री प्रदर्शनामध्ये लगतच्या जिल्ह्यातील जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांशी समन्वय साधून तेथील स्वयंसहायता बचत गटांनाही सहभागी होण्याची संधी देण्यात यावी.

६. सर्व जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांनी बचत गटांची शिफारस करताना कोणताही बचत गट २ पेक्षा जास्त वेळ प्रादेशिक सरस प्रदर्शनात सहभागी होणार नाही याची दक्षता घ्यावी.

७. प्रदर्शनामध्ये सहभागी होणारे कारागिर हे दारिद्र्य रेषेखाली स्वयं सहाय्यता गटातील व स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजना, आयआरडीपी, डवाक्रा या योजनेअंतर्गत सहाय्य देण्यात येत असलेले दारिद्र्य रेषेखालील स्वयंरोजगारी आहेत याची खात्री करून घेण्यात यावी. तसेच ३०% स्वयं सहाय्यता गट/ स्वयंरोजगारी नव्याने सहभागी होतील याची दक्षता घेण्यात यावी. तसेच व्यावसायीक वितरक यांचा सहभाग होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

८. प्रदर्शनात सहभागी होणाऱ्या बचत गटाचे प्रतिनिधीत्व केवळ बचत गटातील सदस्य व्यक्तीच करेल. बचत गटातील सदस्याव्यतिरिक्त इतर कोणतीही व्यक्ती प्रदर्शनास उपस्थित राहणार नाही, याची संपूर्ण खबरदारी संबंधित प्रकल्प संचालक यांनी घ्यावयाची आहे. तसेच एका बचत गटाचे एकावेळी जास्तीत जास्त दोन पेक्षा अधिक सदस्य प्रदर्शनामध्ये सहभागी होणार नाहीत याची दक्षता घ्यावी.

९. आयोजित केलेल्या प्रदर्शनाची शासनस्तरावरून केव्हाही पाहणी करण्यात येईल.

प्रदर्शनावर होणारा खर्च लेखाशीर्ष (०१) (०४) प्रदर्शने व कायमस्वरुपी विक्री केंद्रे बांधणे. योजनांतर्गत / दत्तमत ३३-अर्थसहाय्य (२५०११९९३) या शीर्षाखाली नमूद करण्यात यावा.

सदर परिपत्रक शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईट वर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१०१२२४१८५९३६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(अविनाश सुभेदार)**
**उप सचिव महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त, कोकण / पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर विभाग.
२.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती जि.ग्रा.वि. यंत्रणा (सर्व).
३. उप आयुक्त (विकास), कोकण / पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर विभाग.
४. प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, (सर्व)
५. जिल्हा कोषागार अधिकारी, (सर्व)
६. कार्यासन अधिकारी योजना-३, योजना-५, योजना-२.
७. निवड नस्ती योजना-१.

शासन परिपत्रक क्र. पणन-२०१०/प्र.क्र.१३३/ योजना-१, दि. डिसेंबर,२०१०, चे सहपत्र

**प्रपत्र-अ**

**राज्य स्तर, महसूली विभाग व जिल्हास्तरीय विक्री प्रदर्शन कालदर्शिका**

| अ. क्र. | विभाग | विभागस्तरीय प्रदर्शन स्थळ | जिल्हा | जिल्हास्तरीय प्रदर्शन स्थळ | कालावधी (५ दिवस) |
|---|---|---|---|---|---|
| २ | **कोकण विभाग** | **ठाणे व रायगड** | | | **३०.१२ ते ५.०१.२०११** |
| | | | रत्नागिरी | रत्नागिरी | २५ ते ३०.१२.१० |
| | | | सिंधुदुर्ग | | |
| ३ | **नाशिक विभाग** | **नाशिक** | **नाशिक** | | **२५ ते ३०.०१.११** |
| | | | धुळे | धुळे | ६ ते १०.०२.११ |
| | | | नंदुरबार | नंदुरबार | २० ते २६.१२.१० |
| | | | जळगांव | जळगांव | ११ ते १५.०२.११ |
| | | अहमदनगर | अहमदनगर | | ७ ते १३.०१.११ |
| ४ | **पुणे विभाग** | **पुणे (भिमथडी जत्रा महोत्सवासोबत) (पूणे जिल्ह्यासोबत)** | | | **२१ ते २४.१०.१०** |
| | | | सातारा | सातारा | ३ ते ७.०१.११ |
| | | | सांगली | सांगली | ७ ते ११.०१.११ |
| | | | कोल्हापूर | कोल्हापूर | १३ ते १६.१.२०११ |
| | | | सोलापूर | सोलापूर | फेब्रुवारी २०११ चा दुसरा आठवडा |
| ५ | **औरंगाबाद विभाग** | **औरंगाबाद** | **औरंगाबाद** | | **३१.१२.१० ते ५.०१.११** |
| | | | औरंगाबाद | औरंगाबाद | ११.०१. ते १५.०१.११ |
| | | | जालना | जालना | २१.२. ते २५.२.११ |
| | | | परभणी | परभणी | ४.२. ते ८.२.११ |
| | | | हिंगोली | हिंगोली | २७.१२. ते ३१ .१२.१० |
| | | | नांदेड | नांदेड | २३.१२. ते २७.१२.१० |
| | | | बीड | बीड | ८.१०.१० ते १२.१०.१० |
| | | | उस्मानाबाद | उस्मानाबाद | ८.१. ते ११.०१.११ |
| | | | लातूर | लातूर | ०१.०३.ते ०५.०३.११ |
| ६ | **अमरावती विभाग** | | अमरावती | अमरावती | ६.१. ते १०.१.११ |
| | | यवतमाळ | यवतमाळ | | १.१.ते ५.१.११ |
| | | | वाशिम | वाशिम | २५.१२. ते ३१.१२.१० |
| | | | बुलढाणा | बुलढाणा | ७ ते ११.१.११ |
| | | | अकोला | अकोला | १८.१२. ते २२.१२.१० |
| ७ | **नागपूर विभाग** | | **नागपूर** | **नागपूर** | १७.१. ते २१.१.११ |
| | | | वर्धा | वर्धा | ७.१.ते ११.०१.११ |
| | | | भंडारा | भंडारा | २२.२.ते २६.०२.११ |
| | | | गोंदिया | गोंदिया | २२.३. ते २६.३.११ |
| | | चंद्रपूर | चंद्रपूर | | २६.१.ते ३०.१.११ |
| | | | गडचिरोली | गडचिरोली | १४.२. ते १८.२.११ |